**सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) च्या आस्थापनेवर शिपाई संवर्गात अनुकंपा नियुक्तीसाठी ८ नियमित पदे निर्माण करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आढावा-१८२४/प्र.क्र.६/आस्था-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख : १२ जुलै, २०२४

**वाचा :**

(१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक-आढावा-१६१६/प्र.क्र.२१३/१९अ, दिनांक १७ जानेवारी २०२३

(२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक- अकंपा-१२१९/प्र.क्र.५६/आठ दिनांक २२ डिसेंबर २०२१.

**प्रस्तावना :**

सामान्य प्रशासन विभाग (खुद्द) चा आकृतीबंध दिनांक १७ जानेवारी २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेला आहे. विभागाचा आकृतीबंध मंजूर करताना गट ड संवर्गात जितके कर्मचारी कार्यरत होते तितकी पदे अधिसंख्य म्हणून गणण्यात येऊन, या पदांवर कार्यरत कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्ति / राजीनामा / मृत्यू इत्यादी कारणास्तव पदे रिक्त झाल्यानंतर ती नियमित पदे आपोआप संपुष्टात येतील, तसेच अधिसंख्य पदे निरसीत झाल्यानंतर बाह्ययंत्रणेद्वारे आवश्यक असेल तेवढे मनुष्यबळ उपलब्ध करुन घेण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे. त्यामुळे विभागाच्या आस्थापनेवर गट ड संवर्गातील नियमित पद उपलब्ध नसल्याने अनुकंपा नियुक्तीसाठी पदे उपलब्ध नाहीत. तरी अनुकंपा तत्त्वावरील नियुक्तीसाठी नियमित पदे निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

अनुकंपा तत्त्वावरील उमेदवारांची नियमित नियुक्ती करणे शक्य व्हावे यासाठी विशेष बाब म्हणून गट ड संवर्गातील पदांच्या सेवा केवळ बाह्ययंत्रणेमार्फत घेण्यापासून सूट देण्याबाबतच्या प्रस्तावास उच्चस्तरीय सचिव समितीने चक्रिय पध्दतीने मान्यता दिली आहे. त्याअनुषंगाने सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक २२ डिसेंबर २०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार गट ड (बहुउद्देशीय वर्ग-४) संवर्गातील रिक्त पदांच्या २०% म्हणजेच सद्यस्थितीत रिक्त असलेल्या ४० पदांपैकी शिपाई (गट ड) संवर्गातील ८ नियमित पदे ( वेतनस्तर एस-१ : रु.१५०००-४७६००) अनुकंपा नियुक्तीसाठी निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च मागणी “क्र.ए-४- २०५२-सचिवालय सर्वसाधारण सेवा (०९०) सचिवालय (००) (०१) सामान्य प्रशासन विभाग ०१ वेतन” या लेखाशीर्षातून भागविण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०६/आपुक, दिनांक २२ फेब्रुवारी, २०२४ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेताक २०२४०७१२१५२९१७८००७ हा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KIRAN KASHINATH SHINDE

Digitally signed by KIRAN KASHINATH SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=e87a32115497d05a2e91b08062bea862d1d55f490eb311d2f0e47e2fa1faf797, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9FF022F2E9C0F3C0DF2FD6BEE75DF1F6AE3C48080BAD7972572EE58C3F741862, cn=KIRAN KASHINATH SHINDE
Date: 2024.07.12 15:40:44 +05'30'

**( कि. का. शिंदे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र शासन यांचे प्रधान सचिव.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
३. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
५. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. कक्ष अधिकारी ( आपुक / व्यय-४ / सेवा-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
१०. निवड नस्ती / कार्यासन-आस्था २